**उद्योग उपसंचालक (तांत्रिक) गट-अ या पदावर नामनिर्देशनाने नियुक्त झालेल्या अधिकाऱ्यांचा परिविक्षाधीन कालावधी समाप्त करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग**
**शासन निर्णय क्र. इएसटी-३४१८/९४/प्र.क्र.३०/उद्योग-३**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक :- ०४ सप्टेंबर, २०१८.

**संदर्भ :** १) शासन अधिसूचना, उद्योग,ऊर्जा व कामगार विभाग, क्र : आयएसटी-२१७०/६०२/ उद्योग-३, दिनांक १०.०७.१९८४
२) शासन निर्णय क्रमांक, आयएसटी-२०११/प्र.क्र.२८२/उद्योग-३, दि.२४.०७.२०१२
३) शासन निर्णय क्रमांक, आयएसटी-२०११/२०३५/प्र.क्र.२७८/उद्योग-३, दि.३१.१२.२०१२
४) शासन निर्णय क्रमांक, नियुक्ती-१०१५/प्र.क्र.५५/उद्योग-३, दिनांक १७.११.२०१५
५) शासन निर्णय क्रमांक, परीक्षा-४११५/४१२/प्र.क्र.८४/उद्योग-३, दि.२३.०९.२०१५ व दि.१५.०१.२०१६
६) शासन निर्णय क्रमांक, इएसटी-३४१६/६०१/प्र.क्र.८९/उद्योग-३, दि.३०.०१.२०१८
७) उद्योग संचालनालय, मुंबई यांचे पत्र क्र. उसं/आस्थापना-१/नियुक्ती/उ.अ. परिविक्षाधीन समाप्ती/२०१८/अे-२२५, दि.०६.०२.२०१८
८) उद्योग संचालनालय, मुंबई यांचे पत्र क्र. उसं/आस्थापना-१/नियुक्ती/उ.उ.सं. परिविक्षाधीन समाप्ती/२०१८/अे-१४३२, दि.२५.०७.२०१८

**प्रस्तावना :**

उद्योग उपसंचालक (तांत्रिक) गट-अ या पदावर संदर्भ क्र.२ येथील शासन निर्णयान्वये ६ उमेदवारांची व संदर्भ क्र.४ येथील शासन निर्णयान्वये १३ उमेदवारांची नियुक्ती करण्यात आली आहे. सदर उमेदवारांना संदर्भ क्र.१ च्या शासन अधिसूचनेतील ४ (अ) (एक) विहित केल्यानुसार २ वर्षांचा परिविक्षा कालावधी लागू आहे. संदर्भाधीन क्र.१ च्या अधिसूचनेनुसार या पदासाठी विहित केलेले परिविक्षाधीन कालावधी पूर्ण करण्यासाठी विभागीय परीक्षा नियम तयार करण्यात आले आहेत. त्यानुसार उक्त आदेशातील एका उमेदवाराने विशेष अतिरिक्त तिसऱ्या संधीत व २ उमेदवारांनी पहिल्या संधीत विभागीय परीक्षा उत्तीर्ण केली आहे.

ज्या अधिकाऱ्यांनी विभागीय परीक्षा उत्तीर्ण केली आहे त्यांचा परिविक्षाधीन कालावधी समाप्त करण्यासाठी आवश्यक असणारा परिपूर्ण प्रस्ताव उद्योग संचालनालय, मुंबई यांचेकडून संदर्भ क्र.७ व ८ येथील पत्र व सहपत्रान्वये प्राप्त झालेला आहे. त्यानुषंगाने सदर प्रस्तावातील ३ परिविक्षाधीन उद्योग उपसंचालक (तां) गट-अ यांचा परिविक्षाधीन कालावधी समाप्त करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :**

उद्योग संचालनालयाच्या आस्थापनेवर उद्योग उपसंचालक (तांत्रिक), गट-अ या पदावर सरळसेवेने नियुक्ती करण्यासाठी महाराष्ट्र लोकसेवा आयोगाकडून शिफारस करण्यात आलेल्या एकूण १९ उमेदवारांनी नियुक्ती स्विकारली असल्याने सदर उमेदवारांना संदर्भाधीन क्र.२ व ४ च्या शासन निर्णयान्वये २ वर्षांच्या परिविक्षा कालावधीसाठी, नियुक्ती देण्यात आली. सदरचे अधिकारी कर्तव्यावर रुजू झाले असून त्यापैकी ३ उमेदवारांनी संदर्भ क्र.१ च्या अधिसूचनेनुसार विहित केलेल्या विभागीय परीक्षेच्या विहित संधीमध्ये सदर विभागीय परीक्षा उत्तीर्ण केली असून त्यांचा परिविक्षाधीन कालावधी संदर्भ क्र.५ अन्वये समाप्त करण्यात आला आहे. तसेच संदर्भ क्र. २ च्या आदेशातील एका अधिकाऱ्यांनी सदर विभागीय परीक्षा विशेष अतिरिक्त तिसऱ्या

संधीत व संदर्भ क्र.३ च्या आदेशातील २ अधिकाऱ्यांनी पहिल्या संधीत उत्तीर्ण केली आहे. या ३ अधिकाऱ्यांच्या गोपनीय अहवालासह परिपूर्ण माहिती उद्योग संचालनालयाकडून संदर्भ क्र.७ व ८ अन्वये प्राप्त झाली आहे.

२. उद्योग संचालनालयाच्या आस्थापनेवर उद्योग अधिकारी (तां) गट-ब या पदावर संदर्भ क्र.३ अन्वये श्री.अ.ता.पाटील व श्री.सं.प्र.पाटील यांची नियुक्ती करण्यात आली होती. सदर पदावर कार्यरत असताना श्री.अ.ता.पाटील व श्री.सं.प्र.पाटील यांची संदर्भ क्र.४ अन्वये उद्योग उपसंचालक (तां) गट-अ या पदावर नामनिर्देशनाने नियुक्ती करण्यात आली व त्यांची पूर्वाश्रमीची सेवा संदर्भ क्र.६ अन्वये जोडून देण्यात आली असल्याने श्री.अ.ता.पाटील व श्री.सं.प्र.पाटील यांनी केलेल्या विनंतीनुसार त्यांना उद्योग अधिकारी (तां) गट-ब या पदावर व्यतीत केलेल्या कालावधीतील वेतनवाढी अनुज्ञेय राहतील.

३. उद्योग उपसंचालक (तांत्रिक) गट-अ या पदाच्या संदर्भ क्र. २ व ४ च्या नियुक्ती आदेशातील अटीनुसार खाली नमूद केलेल्या अधिकाऱ्यांनी २ वर्षांचा परिविक्षा कालावधी समाधानकारकरित्या पूर्ण केला आहे. सदर अधिकाऱ्यांचा परिविक्षा कालावधी त्यांच्या नावासमोर दर्शविण्यात आलेल्या दिनांकापासून समाप्त करण्याचा निर्णय शासनाने घेतला आहे. त्यानुसार सदर दिनांकापासून खाली नमूद अधिकाऱ्यांची उद्योग उपसंचालक (तांत्रिक) गट-अ या पदावरील नियुक्ती नियमित करण्यात येत आहे -

| अ. क्र. | अधिकाऱ्यांचे नाव | रुजू झाल्याचा दिनांक | रजा कालावधी (असल्यास) | परिविक्षा कालावधी समाप्त दिनांक | स्थानापन्न नियुक्तीचा दिनांक |
|---|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ५ | ४ | ७ |
| १. | श्री. गजानन विनायक बेल्लाळे | ०१.०८.२०१२ | २५ | २५.०८.२०१५ | २६.०८.२०१५ |
| २. | श्री.संदीप प्रकाश पाटील | ०१.१२.२०१५ | १२ | १२.१२.२०१७ | १३.१२.२०१७ |
| ३. | श्री.अजयकुमार तानाजीराव पाटील | ०३.१२.२०१५ | ९ | ११.१२.२०१७ | १२.१२.२०१७ |

४. विकास आयुक्त (उद्योग) उद्योग संचालनालय, मुंबई यांनी सर्व संबंधितांना कळवून उपरोक्त अधिकाऱ्यांच्या सेवापुस्तकात योग्य ती नोंद घेण्याची कार्यवाही करावी.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१८०९०४१४४१३९३३१० असा आहे. सदर शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकीत करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्र राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Namdeo Kondiba Bhosale

Digitally signed by Namdeo Kondiba Bhosale
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Industries Energy and Labour Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=8db1ca2341132b954db9052b5ef3bd93e7410456a96fa70df7ff81c68231fcd3, serialNumber=8c6a286229ecc7982a08553f49d547ef64be25c7f26fc96324ece7cccbfeb8c5, cn=Namdeo Kondiba Bhosale
Date: 2018.10.20 16:38:18 +05'30'

**( डॉ. ना. कों. भोसले )**
उप सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रति,**

विकास आयुक्त (उद्योग), उद्योग संचालनालय, मुंबई
सर्व संबंधित अधिकारी

**प्रत :**

१. सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग (पत्राद्वारे)
२. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता /लेखापरीक्षा), मुंबई/नागपूर
३. संचालक, लेखा व कोषागारे
४. उद्योग सह संचालक, विभागीय कार्यालय
५. महाव्यवस्थापक/व्यवस्थापक, जिल्हा उद्योग केंद्र
६. सर्व संबधित जिल्हा कोषागार अधिकारी
७. उप सचिव (१२) सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई.
८. उप सचिव (८) सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई.
९. निवडनस्ती (उद्योग-३).